अन्वेषण, चौकशी किंवा फौजदारी गुन्हयाबाबतचा खटला प्रलंबित असलेल्या निलंबित जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या प्रकरणांचा आढावा घेण्यासाठी <u>मार्गदर्शक तत्वे</u>

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्र.डीईएन २३१०/ प्र.क्र.१२७/ आ-१२

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दि. १६ सप्टेंबर, २०१०.

वाचा :-

१ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर १३९३/ प्र.क्र.७२/ ११ अ, दि.१४ डिसेंबर, १९९५.

२ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर १३९६/ प्र.क्र.२२/ ११ अ, दि.१४ जून, १९९६.

३ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर १३९६/ प्र.क्र.६/ ०६/ ११ अ, दि.२० जुलै, २००६.

४ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर १३०७/ प्र.क्र.३/ ११ अ, दि.१८ ऑक्टोबर, २००७.

५ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.निप्रआ २००८/ प्र.क्र.३/ ०८/ ११ अ, दि.१४ मार्च, २००८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासकीय सेवकाच्या निलंबन प्रकरणाचा आढावा घेण्यासंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुबई यांनी उपरोक्त नमूद शासन निर्णयानुसार मार्गदर्शक तत्वे नमूद केलेली आहेत. त्यानुसार गट "क" व गट "ड" संवर्गातील निलंबित कर्मचा-यांच्या बाबतीत निलंबनाचा आढावा व पुन:स्थापना करण्याबाबत दि.१४ मार्च, २००८ च्या शासन निर्णयानुसार विभागीय आयुक्तांना अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदरचा शासन निर्णय जिल्हा परिषद गट "क" व गट "ड" संवर्गातील कर्मचा-यांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

याबाबत जिल्हा परिषद गट "क" व गट "ड" संवर्गातील कर्मचा-यांच्या निलंबना प्रकरणाबाबत अशी कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे की, जिल्हा परिषदेतील गट "क" व गट "ड" संवर्गातील कर्मचा-याच्या निलंबन प्रकरणाचा आढावा घेताना सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई यांच्या उपरोक्त शासन निर्णयानुसार विहित केलेली मार्गदर्शक तत्वे विचारात घेऊन विभागीय आयुक्तांनी सदर निलंबन प्रकरणांचा आढावा व पुनर्स्थापनेबाबत निर्णय घ्यावा. त्यासाठी विभागीय आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली खाली दर्शविल्याप्रमाणे समिती गठीत करावी :-

| | |
|---|---|
| १) विभागीय आयुक्त | अध्यक्ष |
| २) विभागीय स्तरावरील समाज कल्याण अधिकारी | सदस्य |
| ३) विभागीय स्तरावरील लाचलुचपत प्रतिबंधक विभागाचा वरिष्ठ अधिकारी | सदस्य |
| ४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित जिल्हा परिषदेचे) | सदस्य |
| ५) विभागीय उप आयुक्त (आस्था) | सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९१६१९०९१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्रकाश हिर्लेकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
मा.मंत्री व मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
कक्ष अधिकारी/ अवर सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती कार्यासन आस्था-१२.